सन २०२४-२५ या आर्थिक वर्षा साठी विभागीय व जिल्हा क्रीडा संकुलास अनुदान वितरीत करण्याबाबत.(लेखाशिर्ष २२०४-१८२७)

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : विक्रीस २०२५/प्र.क्र २०/क्रीयुसे-१.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ३१/३/२०२५

वाचा:-

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय, क्र. राक्रीधो २०१९/प्र.क्र. ९२/क्रीयुसे-१, दिनांक २३/३/२०२२.
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र विक्रीस ११२४/प्र.क्र १५९/क्रीयुसे-१, दिनांक २७/९/२०२४.
३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,शासन निर्णय,क्र. विक्रीस ४२४/प्र.क्र ११०/क्रीयुसे-१, दिनांक १५/१०/२०२४.
४) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र .पुमाप्र ३५२४/प्र.क्र. ९७/क्रीयुसे-१, दिनांक १५/१०/२०२४
५) क्रीडा व युवक सेवा संचालनालय, यांचे पत्र क्र. विजिक्रीसं//निमानिवि/२०२४-२५/ का-९/४०९४, दिनांक २४/१/२०२५.
६) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र जिक्रीसं-३०२४/प्र.क्र.१८२/क्रीयुसे-१, दिनांक १३/१/२०२५.
७) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय, क्र.विक्रीस १४२४/प्र.क्र १२०/क्रीयुसे-१ दिनांक २४/३/२०२५
८) क्रीडा व युवक सेवा संचालनालय, यांचे पत्र क्र. विजिक्रीसं//निमानिवि/२०२४-२५/ का-९/५४४६ दिनांक २६/३/२०२५
९) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.पुनर्वि क्र. २८२४/ प्र.क्र ९९/ अर्थसंकल्प, दिनांक २९/३/२०२५.
१०) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०२४/प्र.क्र ८०/अर्थ -दिनांक १७/३/२०२५
११) शासन निर्णय समक्रमांक, दि.३०.०३.२०२५.

**प्रस्तावाना :-**

उपरोक्त संदर्भ क्र.११ येथील शासन निर्णय अधिक्रमित करुन खालीलप्रमाणे सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

२. राज्य क्रीडा धोरणातंर्गत राज्यामध्ये विभागीय/जिल्हा/तालुका स्तरावर क्रीडा संकुले उभारण्याची योजना दिनांक २६ मार्च, २००३ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित केलेली आहे. या योजनेतंर्गत अनुदान मर्यादेत संदर्भ क्र.१ येथील दिनांक २३ मार्च, २०२२ च्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आलेली आहेत्यानुसार नव्याने मान्यता देण्यात .

येणाऱ्या तसेचअद्याप बांधकाम सुरु न झालेल्या क्रीडा संकुलांच्या अनुदान मर्यादेत पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात आली आहे-:

(१) अद्याप प्रशासकीय मान्यता न दिलेल्या अथवा प्रशासकीय मान्यता दिली आहे परंतु, अद्याप प्रत्यक्ष बांधकाम सुरु झालेले नाही, अशा क्रीडा संकुलांबाबत अनुदान मर्यादा खालीलप्रमाणे विहित करण्यात आली आहे:-

| क्रीडा संकुलाचा प्रकार | पूर्वीची अनुदान मर्यादा (लाखात.रु) | सुधारीत अनुदान मर्यादा (लाखात.रु) |
|---|---|---|
| तालुका क्रीडा संकुल | रु .१००.०० लक्ष | रु .५००.०० लक्ष |
| जिल्हा क्रीडा संकुल | रु .८००.०० लक्ष | रु.२५००.०० लक्ष |
| विभागीय क्रीडा संकुल | रु.२४००.०० लक्ष | रु.५०००.०० लक्ष |

(२) अंदाजपत्रकांना/सुधारीत प्रशासकीय मान्यता दिलेल्या व बांधकाम पूर्ण झालेल्या अथवा बांधकाम प्रगतीपथावर असलेल्या/अपूर्ण असलेल्या क्रीडा संकुलांबाबत अनुदान मर्यादा खालीलप्रमाणे राहील:-

| क्रीडा संकुलाचा प्रकार | पूर्वीची अनुदान मर्यादा (लाखात.रु) | सुधारीत अनुदान मर्यादा(लाखात.रु) |
|---|---|---|
| तालुका क्रीडा संकुल | रु .१००.०० लक्ष | रु .३००.०० लक्ष |
| जिल्हा क्रीडा संकुल | रु .८००.०० लक्ष | रु.१५००.०० लक्ष |
| विभागीय क्रीडा संकुल | रु.२४००.०० लक्ष | रु.३०००.०० लक्ष |

३. दिनांक २३ मार्च, २०२२ रोजीच्या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ, परिशिष्ट-ब व परिशिष्ट-क अन्वये विभागीय/जिल्हा/तालुका क्रीडा संकुलातील क्रीडा सुविधांबाबतचा टाईप प्लॅन विहित केलेला असून, परिशिष्ट-ड अन्वये सर्वसाधारण अटी व शर्ती विहित केल्या आहेत.

४. सन २०२४-२५ या चालू आर्थिक वर्षात लेखाशिर्ष २२०४-१८२७ अंतर्गत, ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाखालील मूळ अर्थसंकल्पीय रु.७०.०० कोटी तरतूदी मधून, शासन निर्णय, दिनांक १५/१०/२०२४ अन्वये विभागीय व जिल्हा क्रीडा संकुलांना एकूण रु.४२००.०० लक्ष इतका निधी यापूर्वी वितरीत करण्यात आलेला आहे.

५. अर्थसंकल्प कार्यासनाच्या संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयान्वये, सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता सुधारीत अर्थसंकल्पीय अंदाजानुसार बचत संभवत असलेल्या लेखाशिर्षांमधील तरतूद पुनर्विनियोजनाने वळवून लेखाशिर्ष २२०४-१८२७, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाखाली उपलब्ध केलेली तरतूद रु.२०००.०० लक्ष व मूळ अर्थसंकल्पित तरतूदीतील उर्वरित/अवितरित निधी रु.१८१०.३२ लक्ष अशाप्रकारे एकूण रुपये ३८२०.३२ लक्ष निधी उपलब्ध होत आहे. सदर रु. ३८२०.३२ लक्ष निधी विभागीय व जिल्हा क्रीडा संकुलांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी "मागणी क्र.ई-३, (१०)(०२) क्रीडा प्रशिक्षण केंद्रांची आस्थापना (कार्यक्रम), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), संगणक क्रमांक २२०४-१८२७" या लेखाशिर्षाखाली सुधारित अदांजानुसार अर्थसंकल्पीत उपलब्ध तरतूद व संदर्भ क्र.५ अन्वये पुनर्विनियोजनाने उपलब्ध

तरतूदीतून खालील परिशिष्ट-अ नुसार रु. ३८२०.३२ लक्ष निधी खालील विभागीय व जिल्हा क्रीडा संकुलांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**परिशिष्ट-अ**

| अ.क्र | जिल्हा क्रीडा संकुलाचे नाव | मान्यताप्राप्त अंदाजपत्रकीय किंमत (रु.लक्ष) | यापूर्वी वितरीत केलेला निधी (रु.लक्ष) | या शासन निर्णयान्वये निधी वितरण |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | विभागीय क्रीडा संकुल, मुंबई. | २२५१.८८ | १६७१.१४ | ५८०.७४ |
| २ | विभागीय क्रीडा संकुल, जळगांव. | २४०५४.०० | २०००.०० | ४५०.०० |
| ३ | विभागीय क्रीडा संकुल, लातूर. | ५४००.०० | २३४१.४० | ४५०.०० |
| ४ | विभागीय क्रीडा संकुल, कोल्हापूर. | ५४००.०० | २४००.०० | ५१९.७८ |
| ५ | जिल्हा क्रीडा संकुल, पालघर, | ३३७७.५३ | ७००.०० | ८००.०० |
| ६ | जिल्हा क्रीडा संकुल, नंदुरबार. | २३००.०० | १२१६.७० | ५००.०० |
| ७ | जिल्हा क्रीडा संकुल रत्नागिरी | २७५६.३० | १६४५.०० | २००.०० |
| ८ | जिल्हा क्रीडा संकुल ,सातारा | २३००.०० | ८००.०० | ११९.८० |
| ९ | जिल्हा क्रीडा संकुल, धुळे | २३००.०० | ८००.०० | २००.०० |
| | | एकूण रुपये | | ३८२०.३२ |

२. वरीलप्रमाणे वितरीत केलेला निधी खालील अटी/शर्तीच्या अधिन राहून बांधकामाच्या प्रगतीनुसार वितरीत करण्यात यावा.

I. संबंधित विभागीय व जिल्हा क्रीडा संकुलाचे बांधकाम आराखडे व सुधारीत अंदाजपत्रकास आवश्यकतेनुसार विहित प्राधिकाऱ्यांची तसेच, राज्य क्रीडा विकास समितीने दिलेल्या मान्यतेच्या अधिन राहून निधी मंजूर करण्यात येत आहे.

II. संबंधित विभागीय व जिल्हा क्रीडा संकुलाचे बांधकाम आराखडे व सुधारीत अंदाजपत्रकास आवश्यकतेनुसार विहित प्राधिकाऱ्यांची तसेच, राज्य क्रीडा विकास समितीची मान्यता आवश्यक राहील.

III. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार व मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा असेल, त्याचवेळी आहरीत करण्यात यावा. शासन लेख्याबाहेरील बँक खात्यात हा निधी ठेवण्यात येऊ नये.

IV. राज्य शासनामार्फत वेळोवेळी निर्गमित केलेली वित्तविषयक विविध परिपत्रके/ आदेश/नियम/ शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियमपुस्तिकेतील तरतुदी यांची काटेकोरपणे अंमलबजावणी करुन वितरीत निधीचा विनियोग करण्यात यावा.

V. सदरचा निधी ज्या प्रयोजनाकरिता / बाबींकरिता मंजूर केला आहे, त्याच बाबींसाठी खर्च करण्यात यावा. खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित वेळेत सादर करावे.

३. उपरोक्त बाबीवरील खर्च "मागणी क्रमांक ई-३, २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१६) क्रीडा संकुल, (१६) (०२) क्रीडा संकुलाची स्थापना (कार्यक्रम), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)," संगणक क्रमांक (२२०४ १८२७), या लेखाशीर्षाखाली आर्थिक वर्ष २०२४-२५ करीता उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. वित्त विभाग, शासन परिपत्रक दिनांक १७.३.२०२५ मधील अटी/शर्तीनुसार निधी वितरणाची कार्यवाही करावी.

५. उपरोक्तनुसार क्रीडा संकुलाच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या मंजूर निधी कोषागारातून आहरीत करण्याकरीता विभागीय क्रीडा संकुलाकरिता संबंधित विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, विभागीय क्रीडा संकुल, जळगाव करिता विभागीय उपसंचालक, नाशिक आणि जिल्हा क्रीडा संकुलांकरिता संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.११२/१४७१, दिनांक १३/२/२०२५ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.४६५/व्यय-५, दिनांक २६.३.०२५. अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०२५०३३११११४५१४६४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2025.03.31 11:46:02 +05'30'

**(रणसिंग डेरे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
३) मा.उपमुख्यमंत्री (नगर विकास /गृहनिर्माण) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
४) मा.उपमुख्यमंत्री(वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
५) मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
७) सर्व सन्मा. विधानपरिषद/ विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
८) अपर मुख्य सचिव,( अ.का) क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
९) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) मा. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
११) मा. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
१२) संचालक, लेखा व कोषागारे मुंबई
१३) संबंधित वरिष्ठ कोषागारे अधिकारी (क्रीडा व युवक सेवा संचालनायामार्फत)
१४) संबंधित जिल्हा कोषगार अधिकारी, (क्रीडा व युवक सेवा संचालनायामार्फत)
१५) संबंधित विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, (क्रीडा व युवक सेवा संचालनायामार्फत)
१६) संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी, (क्रीडा व युवक सेवा संचालनायामार्फत)
१७) वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१८) निवड नस्ती क्रीसुसे-१.